स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवी वर्षानिमित्त जिल्हास्तरावर सर्व स्वातंत्र्य सैनिक/त्यांचे जोडीदार यांचा सत्कार करणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकिर्ण-१९२२/प्र.क्र.१८९/स्वासैक-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ११ मे, २०२३.

वाचा:-

१) स्वातंत्र्य सैनिक उत्तराधिकारी संघटना, महाराष्ट्र यांचे दि.२९.८.२०२२ रोजीचे पत्र.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली दि.२९.९.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

स्वातंत्र्य सैनिक उत्तराधिकारी संघटना, महाराष्ट्र यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवी वर्षानिमित्त जिल्हास्तरावर शासना मार्फत भव्यदिव्य कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येवून प्रत्येक स्वातंत्र्य सैनिक व विधवा पत्नी यांचा योग्य तो सन्मान मा.पालकमंत्री यांच्या हस्ते करण्यात यावा अशी मागणी केली होती. स्वातंत्र्य सैनिक व त्यांचे पाल्य यांचे विविध मागण्यांसदर्भात मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली दि.२९ सप्टेंबर, २०२२ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार राज्यातील सर्व स्वातंत्र्य सैनिक / त्यांचे जोडीदार यांचा सत्कार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

देशाच्या स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवी वर्षानिमित्त राज्यातील स्वातंत्र्य सैनिकांनी देशाच्या स्वातंत्र्यासाठी दिलेल्या योगदानाप्रित्यर्थ कृतज्ञतेची भावना व्यक्त करण्यासाठी राज्यातील सर्व स्वातंत्र्य सैनिक/त्यांचे जोडीदार यांचा मानपत्र, शाल व पुष्पगुच्छ देऊन यथोचित सत्कार प्रत्येक जिल्ह्यातील मा.पालकमंत्री यांचे हस्ते करण्यात यावा.

२. सर्व जिल्हाधिकारी यांनी आपल्या जिल्ह्यातील मा.पालकमंत्री यांनी दिलेल्या वेळेनुसार सर्व (केंद्र व राज्य) स्वातंत्र्य सैनिकांचा सत्कार समारंभ आयोजित करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र. ए-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२, सामाजिक सुरक्षा योजनेखालील निवृत्तीवेतने, (००) (०१) स्वातंत्र्य सैनिक व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती, इत्यादींना निवृत्तीवेतन (२२३५ ००१५) (अनिवार्य), ०४ - निवृत्तीवेतनविषयक खर्च या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व खर्च झालेल्या रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करावे. स्वातंत्र्य सैनिक/त्यांचे जोडीदार यांचा सत्कार केल्याबाबतचा अहवाल जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०५१११६५८३३३७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASMITA VIJAY JAWDEKAR

Digitally signed by ASMITA VIJAY JAWDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=dce47c2325a773d2c5904e464f2dd7610434df0ea098c5a7b0f08fd23b9eaf45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ED3CD8A19B9EED13AD198DFE0907ADFD1D015C96DC950F8EFD986587A37546AF, cn=ASMITA VIJAY JAWDEKAR
Date: 2023.05.11 16:58:21 +05'30'

**( अस्मिता जावडेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव
५. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व विधान सभा/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. महालेखापाल १/२ लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
८. महालेखापाल १/२ लेखा व परिक्षा महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
९. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
१०.सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१४.सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१५.वित्त विभाग अर्थसंकल्प ३/अर्थसंकल्प १४/व्यय ४, मंत्रालय, मुंबई
१६.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता)
१७.अपर मुख्य सचिव व वि.चौ.अ. १, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१८. कक्ष अधिकारी स्वासैक २/ स्वासैक३ सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१९.निवड नस्ती (स्वासैक १).